सौष्ठव

सौष्ठव

## अनुक्रमणिका



काव्य = मन
अक्षर = शरीर
शब्द = सौष्ठव

# प्रकाशकीय

ह्या मराठीतील पहिलाच पोस्टर कवितांचा संग्रह तुमच्यासमोर घेऊन येताना मनापासून आनंद होतो आहे. कवितेने आपले स्थान गमावल्यानंतरच्या काळात अश्या प्रकारचे धाडस करणे हे अवघड होते पण कालनिर्णयच्या जयराज साळगावकर व जयंत साळगावकर यांनी हा उपक्रम प्रायोजित करण्याचे मान्य करून आमचा कल्पनाविलास प्रत्यक्षात उतरवला.

ह्या संग्रहाची कल्पना श्रीधर तिळवे आणि मी गप्पा मारत असताना आकाराला आली. दृश्यनियोजनाची जबाबदारी मी व संग्रहाच्या संपादनाची जबाबदारी श्रीधरने घ्यायची अशी कामाची विभागणी झाली ज्या कवितांना दृश्यात्मकतेचे खास अंग आहे अश्या कवितांना प्राधान्य मिळणे अटळ होते. प्रत्यक्ष पोस्टर डिझाईन करण्याची जबाबदारी आशुतोष आपटे, पंकज सोनावणे, पंकज सोमकुंवर, हेमंत लब्धे यांनी स्वीकारली. पोस्टर डिझाईन हे मूलत: आकार, रंग आणि पोत यांचे संयोजन असते, प्रत्येक कविता ही स्वत:चा आशय घेऊनच जन्मत असते तो दृश्यमाध्यमात रूपांतरीत करताना अनेक अडचणी येतात. विशेषत: कवितेचा मानसिक आशय दृश्यात शरीर घेऊन जन्मावा लागतो. माझ्या सुदैवाने सर्वच चित्रकारांनी ह्याबाबतीत विलक्षण आत्मीयता दाखवली चित्रकारांच्या कल्पनाशक्तीला नियंत्रीत करायचे नाही पण त्याचबरोबर कवितेच्या आशयालाही धक्का लागू द्यायचा नाही. अशी दुहेरी कसरत आम्हाला पार पाडायची होती. सर्वांच्या सहकार्याने ती शक्य झाली. त्याची यशस्वीता तुमच्या प्रतिसादावरून कळेलच.

ह्या सर्वच उपक्रमात राजन पाटोळे, आल्हाद भावसार, मंगेश बनसोड, शेखर सरतांडेल, ओम टाईपसेटर्स, जयराज साळगावकर आणि मे. सुमंगल प्रकाशन यांचे मोलाचे सहाय्य झाले. मी ह्या सर्वांचेच मनापासून आभार मानतो. हा संग्रह जयराज साळगावकरांच्या मदतीशिवाय अशक्यच होता त्यांचेही मी मनापासून आभार मानतो.

**भालचंद्र कुवल**

माघ कृष्ण चतुर्थी शके १९१४
(मंगळवार दि. ९ फेब्रुवारी १९९३)

*संग्रहात व्यक्त झालेल्या सर्व मताशी संपादक व प्रकाशक सहमत असतीलच असे नाही.*

# संपादकीय

एखादी कल्पना सुचणे आणि प्रत्यक्षात ती कार्यान्वित आणणे यांच्यातील तफावत हा संग्रह संपादित करताना फारच जाणवली. मराठीतील तिसऱ्या परंपरेतील महत्वाच्या कवींना आम्ही कविता देण्याविषयी विनवले पण वसंत डहाके व प्रभा गणोरकर यांचा सन्माननीय अपवाद वगळता इतरांनी प्रतिसाद दिला नाही. त्यामुळे संग्रहाची गुणवत्ता कमी झाली नाही हे खरे पण अनुवादीत कवितांनी कसर भरून काढावी लागली. ह्याबाबतीत अनिल जोशी व श्री. मंगलेश डबराल यांचे सहकार्य महत्वाचे वाटते.

कविता निवडताना कवितांच्या दृश्यात्मकतेचा विचार प्राधान्याने केला त्याचबरोबर त्या घरात लावल्या जाणार असल्याने पडणारी मर्यादाही लक्षात घ्यावी लागली. त्यामुळे काही चांगल्या कविता वगळल्या गेल्या. एका कवीची एकच कविता पोस्टरवर घ्यायची असे ठरवल्याने ह्या कवींच्या इतर कवितांना न्याय देता आला नाही. काहींनी छापल्या गेलेल्या कविता देऊ केल्या त्या नाकाराव्या लागल्या. पोस्टरवर कविता छापून रिकामे होण्यापेक्षा कवितेसंदर्भात काही मूलभूत विचार मांडावा असे वाटले. त्यातूनच पुरवणीची कल्पना पुढे आली. मराठीतील चौथ्या परंपरेचा शोध हा एक यक्षप्रश्न का आहे याचे उत्तर पहिल्या लेखात आहे तर प्रत्यक्ष चौथ्या परंपरेचा शोध हा दयेन्द्रच्या मुलाखतीचा विशेष होय. दयेन्द्रचे विचार सर्वार्थाने मान्य होण्याची शक्यता कमीच पण कवितेविषयी पुर्नविचार त्यामुळे व्हावा अशी इच्छा आहे. पुरवणीत मराठीत येऊ घातलेल्या नवीन पिढीच्या कवितांना प्राधान्य दिले आहे. मराठीतील भावी कवितेची चाहूल त्यात थोडीफार लागते.

हा संग्रह संपादन करताना आल्हाद भावसार, मंगेश बनसोड, राजन पाटोळे आणि अरुण म्हात्रे यांनी मोलाचे सहाय्य दिले. त्यांच्या सहाय्याविना संपादन अशक्य होते. हे सर्वच कवितेने झपाटलेले. अरुणने आपली जेष्ठता कधीच जाणवू दिली नाही. म्हणून त्याचे विशेष कौतुक वाटते. संग्रहाचा आर्थिक भार उचलला जयराज साळगावकर व भालचंद्र कुवल यांनी.

ह्या संग्रहासाठी सर्वच कवींनी अतिशय मोलाचे सहाय्य दिले. कवितेइतकेच महत्वाचे कलावंत म्हणजे आमचे आशुतोष आपटे, पंकज सोनावणे, पंकज सोमकुंवर, हेमंत लब्धे हे चित्रकार मित्र. ह्या संग्रहाच्या यशात त्यांचा सिंहाचा वाटा आहे. ह्या सगळ्यांचेच मनापासून आभार!

माझ्या सर्वच उपक्रमांना डॉ. सरोजिनी वैद्य यांचा पाठिंबा असतोच. त्यांच्या पाठिंब्याची इतकी सवय झाली आहे की तो मी अनेकदा गृहीतच धरून जातो. त्यांनी मला दिलेल्या मोकळिकेबद्दल त्यांचे मनापासून आभार!

आपण आमच्या ह्या धाडसी उपक्रमाचे मनापासून स्वागत कराल याची खात्री वाटते.

**श्रीधर तिळवे**

# चौथ्या परंपरेचा शोध : एक यक्ष प्रश्न

**-श्रीधर तिळवे**

मराठी कवितेच्या इतिहासाकडे दृष्टिक्षेप टाकला तर नेहमीच जाणवते की दर वीस ते तीस वर्षांनी मराठीत एक नवीन परंपरा उभी राहिली आहे. प्रत्येक नव्या पिढीने दर तीस वर्षानंतर एक नवी स्वायत्त काव्यभाषा घडवलेली आहे. ह्या नियमानुसार आमच्या पिढीने नवी काव्यभाषा घडवायला हवी हाच दृष्टिकोन ठेवून प्रत्यक्षात नव्या कवींच्या कवितेकडे पाहिले तर मात्र अस्वस्थतेखेरीज काहीही पदरात पडत नाही.

एका अर्थाने आमची पिढी करंटी आहे. आधीच्या पिढ्यांना जसा एक नवा आशय ठोसपणे मिळाला तसा आम्हाला मिळालेला नाही. आमचे बालपण इंदिरा गांधींच्या भोंगळ राजवटीच्या अंगाखांद्यावर गेले आहे. सांस्कृतिक उन्मेषांचा पद्धतशीरपणे घडवल्यासारखा ऱ्हास आम्ही आमच्या शालेय व महाविद्यालयीन जीवनात पाहिला आहे. खेळायला फुटबॉल किंवा क्रिकेटची कीट मिळावी म्हणून आमच्या पिढीने अत्यंत उथळपणे काही मूर्ख उमेदवारांचा प्रचार केला आहे. कॉलेज जीवनात निवडणुका जिंकण्यासाठी आम्ही उमेदवार पळवण्यापासून ते स्त्री मतदारांना बलात्काराच्या धमक्या देण्यापर्यंत मजल गाठली. टी. व्ही. ने आमचे सांस्कृतिक जीवन घडवल्यामुळे संस्कृतिचा भाषिक अभ्यास आमच्यापासून दुरावला आणि अत्यंत उथळ करमणूकीच्या गुलालात आम्ही सांस्कृतिक अस्मितेचं कुंकू पुसून तिला विधवा केली. मुलीचा फ्लॅट किंवा नोकरी हा आमच्या प्रेमाचा प्रमुख निकष आहे. एकीकडे ब्ल्यू फिल्ममुळे संभोगाबाबत नष्ट झालेली लज्जेची भावना तर दुसरीकडे जात बघून प्रेम करणाऱ्या पोरीबाळी यांच्या विचित्र कैचीत आम्ही जगतो आहोत. एकीकडे टीव्हीमुळे संपूर्ण विश्‍व आमच्या अंगणात तर दुसरीकडे आमच्याच घरातल्या राम, मौलाना आझाद, म. फुले यांच्याबद्दल आम्हाला जे वाटतं ते दृष्य माध्यमात्त मांडायला परवानगी नाही. टीव्ही, चित्रपट जाऊ द्या पण साधा नाटकाचा वापर करायचा म्हटला तरी सेन्सॉरचे व्यक्तिस्वातंत्र्यांचा पुरता खिमा करणारे नियम आमच्या बोडक्यावर बसलेच आहेत. पूर्वी संस्कृतीच बधीर वाटायची आताशा आमची सर्जनशील जाणीवच बधीर झाल्यासारखी वाटते. आमचं सद्याचं सांस्कृतिक वय पाच आहे आणि अशा सांस्कृतिक अनाथाश्रमात मला आणि आमच्या पिढीला स्वतःची नवी कविता शोधायची आहे, तिची नवी स्वायत्त भाषा घडवायची आहे.

आमच्या पिढीत चटकन जाणवणारी पहिली गोष्ट कोणती असेल तर ती म्हणजे कवितेचे सांस्कृतिक जीवनातले स्थान जवळ जवळ संपुष्टात आले आहे. लोक आजकाल टीव्हीमुळे काही वाचतच नाहीत आणि त्यांनी काही वाचायचा प्रयत्न केला तर ह्या प्रयत्नांची मजल कथा-कादंबरीपलिकडे जात नाही. त्यामुळे देवाचे लाडके म्हणवून घेणाऱ्या कवीच्या 'इगोचा' आज पार भुगा झालेला दिसतो. एकीकडे वैश्‍विक दर्जा असलेली उत्तमोत्तम कविता दिलीप चित्रे, अरुण कोल्हटकर, वसंत डहाके, नामदेव ढसाळ प्रभृतिंच्याकडून निर्माण होत असतांना दुसरीकडे ह्या नावाचे कोणी लेखक मराठीत आहेत आणि ते कविता करतात ह्याची सामान्य रसिकांना साधी कल्पनासुद्धा नाही. नेमाडेंनी आदिलेखक नष्ट झाल्याबद्दल खंत व्यक्त केली होती. आम्हाला तर आदिकवी जाऊ द्या कवी देखील नष्ट होत चाललाय त्याबद्दल जाणीव नाही आणि जाणीव झाली तरी त्याबद्दल खंत नाही. ह्यामागचे मुख्य कारण अर्थातच शिक्षण आहे. आपल्या शिक्षण पद्धतीत कविता ही देखील चित्रकला किंवा शिल्पकलेसारखी कला असून तिच्यासाठी साधना करावी लागते आणि ही साधना निर्मिक आणि आस्वादक दोघांनाही करावी लागते याची साधी जाणसुद्धा नाही. आपल्या वाङ्मय शिकवणाऱ्या बऱ्याच प्राध्यापकांची लायकी शंकास्पद आहे, ह्यातील अनेकांना १९६० नंतर मराठी वाङ्मयात काही स्थित्यंतरे झाली याची माहिती नाही. मराठीचा नवा अभ्यासक्रम जाहीर झाला की त्या त्या पेपरचे गाईड खरेदी करण्यासाठी विद्यार्थ्यांपेक्षा स्वतःचा क्लेम आधी लावणारे प्राध्यापक माझ्या परिचयाचे आहेत. ह्यातल्या काही बुद्धाचार्यांना नवीन कवितेविषयी

काडीचीही आस्था नाही. मध्यंतरी एका विद्यापीठात नामदेव ढसाळांचा 'गोलपिठा' अभ्यासक्रमात समाविष्ट होणार म्हणताच ह्या बुद्धाचार्यांपैकी एकाने शिवाम्बू पिऊन एक समविचारी प्राध्यापकांची चळवळवजा गर्दी जमवून तो काव्यसंग्रह रद्द करवला होता. असे हे प्राध्यापक आम्हाला आधुनिक कविता शिकविणार तरी काय? जे मूळात त्यांनाच समजलेलं नाही ते आम्हाला उलगडून दाखवणार तरी काय? (अर्थात सर्वच प्राध्यापक असे नाहीत) बरं ही कविता निदान टेक्स्टबुकातून आमच्यापर्यंत पोहचण्याचे काही चान्सेस? त्याबाबतीतही एक सार्वत्रिक अराजक. केकावली, आख्यानकविता, हरपले श्रेय, सुधारकातले तुकडे वाचून कुणा नवीन पोराला काव्याविषयी आवड निर्माण होणे शक्य आहे का? (ज्ञानेश्वर आणि महानुभावी साहित्याच्या अभ्यासकांना एक नव्या पिढीची सूचना विन्दानी जसे अमृतानुभवचे अर्वाचिनीकरण केले तसे ज्ञानेश्वरीय आणि महानुभवीय साहित्याचे कुणीतरी अर्वाचिनीकरण करा. शब्दांचे अर्थ लावत त्यांचा आस्वाद घेण्याचा संयम आमच्या पिढीजवळ नाहीये आणि तेवढा वेळही नाही. आम्हाला आधुनिक साहित्यातले जगभर पसरलेले हजारो मास्टरपीस वाचायचे आहेत) मध्यंतरी तर शासनाने लायकी नसलेल्या दलित कवींच्या कवितेची एकच भरताड पाठ्यपुस्तकांत केली होती त्यावरून माझ्या समकालीन मित्रांचा दलित कवितेविषयी भलताच गैरसमज झाला. हे लोक निबंध लिहिण्याऐवजी कविता का लिहितात ह्या प्रश्नाचे उत्तर मला शेवटपर्यंत देता आले नाही. शेवटी नामदेव ढसाळ आणि यशवंत मनोहर त्यांच्या हातात ठेवले आणि ते वाचल्यानंतर बिचाऱ्यांचे आत्मे संतुष्ट झाले. पूर्वी केशवसुतांसारखा एक अत्यंत सामान्य कवी महान म्हणून बोडक्यावर मारला जायचा. आता ती जागा काही दलित कवींनी घेतली आहे. थोडक्यात काय तर आम्हाला कविता कशी शिकवायची त्याची अक्कल नाही. ती शिकवणाऱ्यांची निवड कशी करायची त्याची अक्कल नाही आणि कोणत्या कविता निवडाव्यात त्याचीही अक्कल नाही. आपण एकविसाव्या शतकात चाललोय आणि मराठीचा अभ्यासक्रम त्याप्रमाणे बदलून घ्यायला हवा हे आपल्या अजूनही लक्षात येत नाही. माझे तर असे स्पष्ट मत आहे की मराठीच्या पाठ्यक्रमात निम्म्या कविता किंवा गद्य हे त्या त्या वर्षाच्या जास्तीत जास्त २० वर्ष आधीच्या हव्यात म्हणजे १९९० साली पाठ्यपुस्तक तयार करताना निम्म्या कविता १९७१-१९९० ह्यांच्या दरम्यानच्या हव्यात. गद्य साहित्य तर १० वर्षातलेच लावावे तरच विद्यार्थ्यांच्या त्याचे स्वतःचे जगणे आणि त्याची होत असलेली भाषिक अभिव्यक्ति यांचा एकमेकांशी असलेला नेमका संबंध लक्षात येईल. या निवडीत सर्वच कविता सोप्या निवडणे परवडणारे नाही. हे करताना संत, पंत आणि पंथ बाजूला ठेवावे लागले तरी चालतील.

आमच्या पिढीपुढे दुसरा जो महत्वाचा प्रश्न उभा राहिला आहे तो खुद्द मराठी कवितेविषयी. आपल्या पिढीकडे मागील पिढ्यापेक्षा नवीन असे काही सांगण्यासारखे आहे का किंवा जे जुनेच आहे, ज्यात फारसे परिवर्तन झालेलं नाही ते नवीन शैलीत मांडता येईल का? असा हा प्रश्न आहे. मराठीच्या आधुनिक काव्यपरंपरेत नेहमीच परंपरा आणि विस्तार अशा पद्धतीने संक्रमण झालेलं आहे. मराठीची पहिली परंपरा सुरू झाली केशवसुतांपासून आणि बालकवी, गोविंदाग्रज, बी, तांबे कवींनी तिचा पाया घातला तर माधव जुलियनच्या पिढीने तिचा विस्तार केला. तिचे सर्वसंपन्नत्व कै. बोरकर, ना. घ. देशपांडे, कुसुमाग्रज प्रभृतींनी प्रकट केले. मराठीची दुसरी परंपरा सुरू केली बा. सी. मर्ढेकरांनी आणि पु. शि रेग्यांनी. शरद्चंद्र मुक्तीबोध, विन्दा करंदीकर यांनी तिचा पाया घातला तर ती भाषिक सामर्थ्यासह सर्वसंपन्न झाली सदानंद रेगे, आरती प्रभू, ग्रेस, इंदिरासंत, वा. रा. कांत, य. द. भावे यांच्या कवितेत. यातल्या पहिल्या परंपरेत आशयनिष्ठ भूमिका अधिक बलवान होती तर दुसऱ्या परंपरेत आकृतीवादी भूमिका अधिक सामर्थ्यशील दिसते. निर्भरशील युद्धपूर्व असा ठोस आशय पहिल्या पिढीकडे दिसतो तर दुसरी पिढी युद्धोत्तर जाणीवांनी झाकोळलेली दिसते. तिसरी परंपरा सुरू झाली ती दिलीप चित्रे, अरुण कोलटकर, नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ, मनोहर ओक वगैरे प्रभृतींपासून. दुसऱ्या परंपरेला श्री. पु. भागवत आणि राम पटवर्धन यांच्यासारखे साक्षेपी संपादक मिळाले व त्यांनी जशी साहित्यात एक महत्वाची भूमिका बजावली नेमकी तशीच

महत्वाची भूमिका या परंपरेत अशोक शहाणे, राजा ढ़ाले वगैरे प्रभृतींनी बजावली. ही परंपरा चंद्रकात पाटील, यशवंत मनोहर, वसंत डहाके, प्रभा गणोरकर, तुलसी परब, सतीश काळसेकर, प्रकाश जाधव, विलास सारंग, गुरूनाथ धुरी. ना. धो. महानोर, मल्लिका अमरशेख यांच्यामुळे अधिकच संपन्न भासते. आधीच्या क्रांत्या ह्या काहीशा व्यक्तींनी घडवल्या होत्या. इथे मात्र कवींचा एक समूहच हे परिवर्तन घडवू आणू पाहताना दिसतो. संवेदनाचे सरळ भाषांकन करणे ही ह्या सर्वांची वृत्ती. तर परंपरेची मुळे सखोल शोधून तिची आधुनिकतेशी योग्य सांगड घालून कविता पुढे नेण्याची किंवा तिच्या परंपरेच्या विरोधात उभे ठाकण्याची ह्या सर्वांची धडपड! ह्या लोकांनी खऱ्या अर्थाने मराठी कविता वैश्विक केली. पहिल्या परंपरेत अत्यंत दुय्यम दर्जाची कविता जास्त लिहिली गेली अपवाद बोरकर, कुसुमाग्रज यांच्या काही कविता. दुसऱ्या परंपरेत कविता गुणवत्तेच्या दृष्टीने खूपच सुधारली पण पु. शि. रेगेंचा अपवाद वगळता आशय आणि माध्यम यांच्याचलं अद्वैत कुणालाच साधलेलं दिसत नाही. विन्दा करंदीकर, ग्रेस यांची वैश्विक गुणवत्ता तर केवळ त्यांच्या तंत्रशरणतेमुळे मारली गेली मर्ढेकरांचा काहीसा अकालीच मृत्यु झाला. मात्र ह्या काळातली कविता गुणवत्तेच्या दृष्टीने वैश्विकतेच्या घराचे दरवाजे ठोठावताना दिसते. तिसरी परंपरा मात्र सरळ हे दार तोडून आत घुसली. तिची अंगभूत गुणवत्ताच अशी होती की तिला थांबवणे कुणालाच शक्य नव्हते. परंपरेचे भान राखत आणि आशय व आकृती यांच्यातील अद्वैत कुठेही न सोडत या पिढीनें आपली कविता घडवली. प्रतिमांच्या जंजाळातून, कल्पनाजन्य चमत्कृतीतून कवितेला मुक्त करून तिला आशयसन्मुख केले. एकीकडे स्वत:च्या परंपरेत स्वत:ची मुळे शोधत तर दुसरीकडे इतर भाषिक संस्कृती आपल्या परिघात समाविष्ट करून या सर्वांनीच ही कविता एकीकडे सखोल तर दुसरीकडे मोठा कॅनव्हास व्यापणारी बनवली. आशयाला अलंकृत करण्याचे टाळून त्यांनी कविता एकीकडे नैसर्गिक केली तर दुसरीकडे केशवसुती सरधोपटपणा टाळून मोजक्या पण अर्थवाही प्रतिमांच्या समावेशानी ती निबंध होणार नाही याची काळजी घेतली. व्यंगार्थाचा अतिरेक टाळला आणि

पिढीची दिसते. ह्यातल्या अनेकांनी आपले नाते दुसऱ्या आकृतीवादी परंपरेशी जोडलेले दिसते पण गंमत अशी आहे की दुसऱ्या पिढीचा आकृतीवाद देखील आमच्या पिढीतल्या लोकांना नीट समजलेला दिसत नाही. ह्यातील अनेक कवी ग्रेस, रेगे, मर्ढेकर यांचे उथळ अनुकरण करताना दिसतात. अनेकांना तर ग्रेस सारखी दुर्बोधता आपल्या कवितेत असणे भाग्याचे वाटते. वास्तविक जो गूढपणा ग्रेसमध्ये आढळतो तो त्याच्या व्यक्तिमत्वाची अपरिहार्य परिणिती आहे. अशा प्रकारचं व्यक्तिमत्व आपल्यात नसताना देखील अनेक कवींनी अशा तथाकथित दुर्बोध कविता लिहिलेल्या दिसतात. क्वचित कोल्हापूरचा विजय पवार सारखा कवी ग्रेसशी नाते सांगून देखील स्वत:ची स्वतंत्र कविता घडवताना दिसतो. बाकी ह्या बाबत अनुकरणच अधिक दिसते. अनेकांचे आकलन तर वरवरचे आहे. दुसऱ्या परंपरेची सैद्धांतिक भूमिका आकृतिवादी असली तरी तिची कविता एक ठोस आशय मांडताना दिसते हे अनेकांच्या लक्षात आलेले दिसत

आमच्या पिढीतले आकृतिवादी कवी हे ग्रेस आणि सुरेश भट ह्या वृत्तींनी आणि प्रवृत्तींनी प्रचंड भिन्न असलेल्या कवींमध्ये भटकतांना दिसतात. आकृतीवादी परंपरेशी नातं सांगू पहाणाऱ्यापैकी एकाही कवीला अद्याप स्वत:ची स्वायत्त ओळख सापडलेली दिसत नाही. आमच्या पिढीच्या आधीच्या वासंती मुजुमदार, अरूणा ढेरे, अरूण म्हात्रे आदींच्या कवितेत ह्याबाबत केवळ एक आश्वासन दिसते पण त्याची पूर्ती दिसत नाही. आकृतीवादाची ही शोकांतिका होत असतानाच आशयवादी कवीही एका आवर्तात सापडलेले दिसतात. आमच्या पिढीला नवा क्रांतिकारक आशयच उपलब्ध नसल्याने क्रांतिकारक आशयाची नवीन कविता लिहिण्याचे कर्तृत्व तिच्या ठायी जमा होणे अवघडच दिसते. त्यामुळे नवीन चौथी परंपरा उभी व्हावी असे वाटणारे कवीही असहाय्य झालेले दिसतात. 'दशकांच्या कविता' मधील पिढी साध्या-सोप्या भाषेत कविता लिहून गेली. स्वतंत्र भारतात जन्मलेल्या ह्या पहिल्या पिढीला कवितेच्या क्षेत्रात फारसे

वाटणारी क्रांतिकारक कविता आमच्या पिढीला चक्क भाबडी वाटते. त्यामुळे ह्या कवितेशी नाते जोडणे आम्हाला शक्य होत नाही. त्यातच गोर्बाचेव्हनी केलेल्या क्रांतीमुळे मार्क्सवाद हे एक कालबाह्य ठरले तत्वज्ञान असल्याचे सिद्ध झाले आहे. त्यामुळे तथाकथित मार्क्सवादी दृष्टीकोन आणि नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ यांची कविता आम्हाला भावत नाही. त्यांच्या कविता म्हणजे केवळ पोकळ वल्गना वाटतात. ज्या गजानन माधव मुक्तिबोधांचा वास्ता लघुनियतकालिकांचे अर्ध्वयु चंद्रकांत पाटील देत असतात त्यांची मीमांसा व कविता आता पटत नाही. हिंदीतील ही सर्वच डावी परंपरा आता भावत नाही. त्यामुळे ह्या कवितेशी नाते जोडणे आता अवघड वाटते. त्यामुळे ह्या तथाकथित परिवर्तनवादी चळवळींशी निगडीत असलेले आशयद्रव्य स्विकारणे आता अवघड वाटते. त्यामुळे ह्या तथाकथित परिवर्तनवादी चळवळींशी निगडीत असलेले आशयद्रव्य आता दुरावले आहे. त्यापेक्षा दिलीप चित्रे (मला व्यक्तिश: विसाव्या शतकातला सर्वश्रेष्ठ मराठी कवी दिलीप चित्रेच वाटतो) अरुण कोलटकर यांची त्यांच्या अस्तित्वानुभवाशी नाते सांगत व परंपरेचे भान राखत आलेली कविताच आम्हाला अधिक भावते पण ही कविता मुळातच अनुकरणाला अतिशय कठीण असल्याने सर्वसाधारण कवी तिच्या वाटेलाही जाताना दिसत नाही. त्यातच ह्या पिढीची समीक्षादृष्टी मग ती नेमाडेंची असो किंवा दिलीप चित्रेची असो संपूर्ण स्वीकारणे अवघड जाते. विशेषत: ह्या लोकांचा परंपरेचा गौरव बुचकळ्यात टाकणारा आहे. संतकवींशी नाते जोडण्याची सक्ती आम्हाला पटत नाही. नेमाडेंची वास्तववादी भूमिका तर सरळ सरळ कालबाह्य वाटते. कादंबरीतील वास्तवसन्मुख भुमिका कवितेला स्वभावेच पेलता येत नाही. मुळातच टीव्ही सारखे प्रचंड ताकदीचे माध्यम असताना साहित्याने परंपरेचे आणि जीवनाचे वस्तुनिष्ठ चित्रण करावे हा हव्यास मुर्खपणाचा वाटतो. कारण अशा वस्तुनिष्ठ चित्रणासाठी कॅमेरा नावाचे सशक्त माध्यम जन्मलेले आहे. तेव्हा ही वास्तववादी भुमिका परवडणारी नाही. ज्यांना वस्तुनिष्ठ अनुभव हवा आहे त्यांनी ह्यापुढे चित्रपट किंवा टी.व्ही सिरीयल काढाव्यात हे उत्तम! साहित्यात हा वास्तववाद कालबाह्य वाटतो. किंबहुना दृश्यमाध्यमाचा वाढत्या

प्रभावामुळे साहित्याचे प्रयोजनच बदलले आहे असे माझे स्पष्ट मत आहे. जो अनुभव दृश्य माध्यम देऊ शकत नाही तो अनुभव भाषेने द्यायला हवा असे मला वाटते आणि त्यादृष्टीने एकविसाव्या शतकात कविता हा सर्वश्रेष्ठ वाङ्मय प्रकार म्हणून पुन्हा उदयास येईल. ह्याविषयी माझ्या मनात शंका नाही. थोडक्यात काय तर तिसऱ्या परंपरेची समीक्षादृष्टी शंकास्पद वाटते. त्यातच गजानन मुक्तिबोध, सर्वेश्वरदयाल सक्सेना आदि डाव्या विचारांच्या श्रेष्ठ कविता वाचून देखील त्यांच्या तुलनेत नारायण सुर्वेची कुवत दिसत असूनही त्यांचा सर्वश्रेष्ठ कवी म्हणून ह्यांनी केलेला गौरव, नामदेव ढसाळांच्या कवितेतल्या अनुभवातली वाढती यांत्रिकता, चंद्रकांत पाटलांची वर्तमानपत्री कवितेकडे सुरू झालेली वाटचाल (इत्यंभूत) दलित कवितेचा आशय आणि अभिव्यक्ती ह्या दोन्ही संदर्भातला साचेबंदपणा, संत कवी व परंपरा ह्यांच्याबाबत वाजवीपेक्षा जरा अधिकच निघणारा गहिवर, कादंबरीला बखर करण्याचा चाललेला प्रयत्न (आणि त्या नादात 'कोसला' ही जगातील एक श्रेष्ठ कादंबरी लिहून ५० वर्षे कादंबरी पुढे नेल्यानंतर बिढार, जरीला, झूल सारख्या वास्तववादी कादंबऱ्या लिहून तिला पुन्हा ३० वर्षे मागे खेचणें (त्याही उत्तमच आहेत), ग्रेसच्या कवितेतील ''वासनेचे मायानुभव व न झेपणारी संन्यस्तवृत्ती'' यांच्यात चाललेली रस्सीखेच लक्षात न घेताच जणु काही रोमॅण्टिक असणें हा गुन्हाच आहे असे मानून त्याच्यावर चढवलेले हल्ले (वास्तविक पु. शिं. नंतर ग्रेस हाच समर्थ आणि अस्सल रोमॅन्टीक कवी. नाहीतर मराठीतील बहुतेक रोमॅन्टी–सिझम हा उसना आणि उथळच आहे) खानोलकरांच्या कोकणी (किंवा देशीयतेच्या भाषेत देशी) अद्भूताकडे दुर्लक्ष करून नीतीची ढाल पुढे करून भाऊ पाध्येंच्या ढिसाळ कादंबऱ्यांचे कौतुक करणे, जी. ए. वगैरेंच्या कथा, नाटक वगैरे बाबतीत ह्या लोकांचे पाळलेले सोयिस्कर मौन, हिंदीतील केदारनाथसिंह, मुक्तीबोध वागळून श्रीकांत वर्माच्या सामान्य काव्यसंग्रहाची अनुवादासाठी केलेली निवड ह्या सर्व गोष्टीवरून ह्या लोकांचे ऐतिहासिक कार्य आता संपले असे म्हणायला हरकत नाही. दलित कवींना हल्ली कवितेतही बी. सी. सवलत मिळतेय की काय असे वाटावे. अशा पद्धतीने हल्ली त्यांचे कौतुक होताना दिसते. त्यामुळे ही कविताही आता संपली आहे. तिने आत्मपरीक्षण केले तर ठीक आहे. नाहीतर आशयाऐवजी विचार जास्त व्यक्त करणारी ही कविता मृत्यु पावेल ह्याविषयी शंका नाही. एकीकडे आकृतीवादाच्या सामर्थ्याचा अस्त झालेला दिसत असतानाच आशयवाद्यांचाही मृत्यु होताना आमच्या पिढीने पाहिलेला आहे त्यामुळे आमची गोची अधिकच गुंतागुंतीची आहे. आशयद्रव्याचा हा साचेबंदपणा आणि अभिव्यक्तीच्या चोखाळून झालेल्या पायबंद वाटा ह्यामुळे आम्ही एका विचित्र आवर्तात सापडलो आहोत. एकीकडे ग्रेसच्या प्रतिमावादी ओंढाळ शब्दकाहुरांचे वाटणारे आकर्षण, दुसरीकडे दलित कवितेची सांकेतिक धुम्मस तर तिसरीकडे लघुनियतकालिकांनी वापरून वापरून शिळा केलेला आशय ह्यांच्यात हिंदकळणाऱ्या धेडगुजरी वाङ्मयीन संस्कृतीत आमची वाढ झाली आहे त्यामुळे अलीकडील काही कवी धड आकृतीवादीही नाही, आशयवादीही नाही, धड आत्ममग्नही नाही, धड वस्तुनिष्ठही नाही अशी एक मिश्र कविता निर्माण करताना दिसतात. मराठी वाङ्मयीन संस्कृतीचा धेडगुजरीपणा हा एक त्यामुळेच चिंतेचा विषय झाला आहे.

अश्या ह्या धेडगुजरी वाङ्मयीन संस्कृतीत चौथी परंपरा निर्माण करणे हा त्यामुळेच एक यक्षप्रश्न बनलेला आहे ह्या यक्षप्रश्नांची उत्तरे शोधणारा धर्मराज मात्र कुठेच आढळत नाही. हा धर्मराज जेव्हा जन्मेल तेव्हा जन्मो पण सध्यातरी हे यक्षप्रश्न किमान समजून घेणे हे अत्यंत आवश्यक आहे. प्रश्नाची संपूर्ण उमज हे त्या प्रश्नाचे अर्धे उत्तर असते. ही समज, ही उमज नव्या कवींना लवकर येवो अशी प्रार्थना करणे एवढेच सद्या आपल्या हाती आहे.

(अक्षरचळवळमधून अंशिक पुनर्मुद्रीत)

# चौथ्या परंपरेचा शोध : एक संभाव्य उत्तर

—दयेन्द्र नाईक

चन्दु : दयेन्द्र 'निर्वस्तुवाद' ही संज्ञा तू सातत्यानं तुझ्या नव्या कवितासंदर्भात वापरतोयस. तिचा नेमका अभिप्रेत असलेला अर्थ तू सांगू शकशील का?

दयेन्द्र : निर्वस्तुवाद म्हणजे वस्तूंचा अभाव जोरदारपणे मांडणारा वाद. जगातील आतापर्यंतची सर्व कविता व साहित्य हे वस्तूवादी आहे. निर्वस्तुवाद ह्या वस्तुवादाला नाकारतो. तो वस्तूंना, त्या अनुषंगाने येणाऱ्या प्रतिमा प्रतिकांना ठामपणे नाकारतो.

चन्दु : म्हणजे तू साहित्याला दोन गटात विभागतोस.

दयेन्द्र : एका अर्थात वस्तूवादी आणि निर्वस्तुवादी अशा दोन गटात हे साहित्य विभागलं जातय. गद्याबाबत निर्वस्तुवाद काय करेल हे कळायला अद्याप अवकाश आहे. पण कवितेबाबत त्याचे कार्य स्पष्ट आहे. आदिबंधात्मक, संरचनावादी वगैरे समीक्षेने सद्या सर्व सृजनशीलताच वस्तूकेन्द्रीत दृष्टीकोन स्वीकारून यांत्रिक करून टाकलीये ती मोकळी व्हायची असेल तर कवितेला वस्तूपासून मोकळे करणे अत्यंत आवश्यक आहे असे माझे स्पष्ट मत आहे. आपल्याकडील केशवसुतापासून चित्रे वगैरे प्रभुतिपर्यंतची सर्व कविता ही वस्तूशरण कविता आहे. कवितेतील वस्तूंचा तोच तोच वापर आशय शिळा करून टाकत असल्याने सद्या जगातील सर्वच कविता आवर्तात सापडलेली दिसते. फ्रान्समधील वस्तुवादी कादंबरीकारानी तर व्यंगार्थाच्या सर्व पातळ्या वापरावयास सुरवात केल्याने आज जगभर कविता कुठे संपते आणि गद्य कुठे सुरू होते ह्याविषयी निश्चित सीमा करणे अवघड बनलेले दिसते. त्यामुळे भाषा पुन्हा संजीवनी घेऊन जन्मावी असे वाटत असेल तर भाषेतील नामापेक्षा क्रियापदांना अधिक महत्त्वाचे स्थान मिळणे अत्यावश्यक आहे असे मला वाटते. हीच गोष्ट विशेषणे व क्रियाविशेषणे ह्या संदर्भात महत्त्वाची आहे असे मला वाटते. भाषिक आशय हा वस्तूप्रधान न करता क्रियाप्रधान करण्याचा प्रयत्न निर्वस्तुवादी कविता करते.

चन्दु : ह्याचा संबंध अनेकदा दृश्यमाध्यमाशी आहे असे तू म्हणतोस.

दयेन्द्र : तसा तो आहेच सद्या सर्व कला ही दृश्यप्रधान झालेली दिसते. विशेषत: चित्रपट व टि.व्ही. प्रसारामुळे सर्व संस्कृतीच दृश्यप्रधान झालीये. पूर्वी ज्या गोष्टी कवितेत व्यक्त व्हायच्या त्या आज सहजपणे दृश्यमाध्यमात व्यक्त होताना दिसतात. दृश्यमाध्यमात ज्या गोष्टी, जो आशय व्यक्त होत नाही तो आज सहजपणे गद्यात व्यक्त होत असताना कवितेची स्वतंत्र अशी गरज काय ह्या प्रश्नाचा शोध मी घेत गेलो आणि मग माझ्या लक्ष्यात आले की कवितेखेरीज इतर माध्यमात वस्तू नष्ट होणं शक्य नाही. कविता हे एकमेव माध्यम असे आहे की त्यात वस्तू त्यांचे आकार सौष्ठव वगैरे सहज नष्ट होतात. म्हणजेच जे कवितेचे स्वायत्त वेगळेपण मी शोधत होतो ते वस्तूंना नष्ट करण्यात आहे हे माझ्या लक्षात आले आणि मग!

चन्दू : म्हणजे हे जाणीवपूर्वक केले गेले.

दयेन्द्र : प्रत्यक्षात दोन तीन कविता प्रथम जन्मल्या आणि त्या एकदम वेगळ्या आहेत हे माझ्या लक्षात आले आणि मग एकंदरंच कवितेबाबत वेगळा विचार चालू झाला. कवितेचे स्वायत्त अस्तित्व हा माझ्या चिंतनाचा पहिल्यापासून विषय होता त्याच्या प्रतिक्रिया म्हणूनच कदाचित ह्या कविता जन्मल्या असाव्यात. चित्रपटापासून व गद्यापासून पूर्ण वेगळी कविता घडविणे हा माझा ध्यास होता तो अशा रितीने फळाला आला.

चन्दू : तू ज्या गद्याची बात करतोस विशेषत: वस्तुवादी कादंबऱ्या ह्या फक्त फ्रेंचमध्येच आहेत. भारतात व मराठी साहित्यात त्यांचा अद्याप पत्ता नाही. म्हणजे तो ट्रेंड अद्याप इथे नसतानाच तू त्या विरुद्ध बंड करतोयस हे तुला विनोदी नाही वाटंत?

दयेन्द्र : फ्रेंचमधल्या परंपरेला मराठीतून आव्हान का देऊ नये? आपण इतकी वर्षे गुलाम राहिलोय की त्यांच्या परंपरा आपणाला त्यांनी तोडल्याशिवाय तोडाव्याशा वाटत नाहीत. म्हणजे प्रथम ते परंपरा देतात आणि मग परंपरेविरुद्धचं बंड देतात म्हणजे परंपरा आणि बंड ह्या दोन्ही गोष्टी आपण तिकडून आयात करतो. मला वाटतं हे आता कुठंतरी थांबायला हवं. एक बंड इकडून जाऊ द्या की, बंड करण्याची मक्तेदारी काही त्यांना दिलेली नाही. शिवाय वस्तुवादी कविता मराठीत पुरेशी प्रस्थापित झालीये असं मला वाटतं. तेव्हा त्याविरुद्ध बंड म्हणून निर्वस्तुवादी कविता येणे हे अपरिहार्य आहे. एक गोष्ट लक्षात घे आपले गद्य मागासलेले असले तरी आपली कविता आज जगाच्या समकालीन आहे. त्यामुळे आपली कविता ही वैश्विक कवितेचेच प्रतिनिधित्व करते. तेव्हा सर्व वैश्विक कवितेविरुद्धचे बंड मी मराठीतून करू शकतो.

चन्दू : पण त्यामुळे तुझे भारतीय परंपरेशी काहीच नातं रहात नाही, असं नाही तुला वाटत!

दयेन्द्र : तुला आश्चर्य वाटेल पण मी जे बंड करतो त्याला भारतीय तत्वज्ञानाचा ठोस आधार आहे. बुद्धाचे एक वचन आहे ''क्रिया अस्तित्वात असतात करणारा भ्रम असतो.'' एका अर्थाने ह्या कवितेला क्रियावादी कविता म्हणता येईल. मात्र ती मोक्षापर्यंत जात नाही. त्यामुळेच ती विशेषणे व क्रियाविशेषणे ह्यांना महत्त्व देते.

चन्दू : तुझ्या ह्या कवितेमुळे मराठीत चौथी परंपरा चालू होईल का?

दयेन्द्र : मला कल्पना नाही. कदाचित ह्या सर्व कविता सामान्य असतील मात्र चौथ्या परंपरेचा शोध त्यामुळेच जर बळावत असेल तरी खूप झाले. चौथ्या परंपरेचा मर्ढेकर जन्मेल तेव्हा जन्मो. पण सध्यातरी मला ह्या पद्धतीचे कविता लिहीणे हे प्रामाणिक वाटते. तिचे होणारे परिणाम माझ्या दृष्टीने दुय्यम आहेत.

---

# नदी

नदीला नसतो

उगम किंवा विकास
आकार किंवा विकार
आरंभ किंवा अंत

म्हणूनच
कोणताही पूल कोसळताना
आता मी हसू शकतो.

**विजय पवार**

# वस्तूंपलिकडच्या कविता

—दयेन्द्र नाईक

१ बहरण्यात नासाडी
ओसरण्यात नासाडी
असण्यात ओसाडी
नसण्याची

२ अनुभव. पूर्वीसारखाच. मागल्यासारखा
सगुण चालणारा निर्गुण हलणारा
विचारणा
मी कडून मीला
आकारांच्या सौष्ठवावर केवळ असणे
नसण्याचे
फसणे
वसण्याचे
रचनांच्या ओबाडधोबाडीवर
वस्तूंच्या पलिकडील प्रयत्न
ज्यांचा भोग केवळ नसणे

क्रिया सरकवणारी सावकाशी पिसाट

न दिसणाऱ्या अवकाशात माझा जन्म

न जाणवणाऱ्या काळात मृत्यू माझा

केवळ ताजा
मागल्यासारखाच
अनुभव. निव्वळ.

३ विचार
वाकतो
माझ्या नशिबात
हुंदडण्यात नांदावे जसे अल्लडपण
गलक्याचा एकच कठोरी दणकटपणा
वाढीत माझ्या अविश्वास
संभ्रम
पर्यायांचा पुकारा

मी निवडतो - नामे
सर्वनामे
विशषणे क्रियाविशेषणे

क्रियापदांच्या हलकट बोम्बाबोम्बीत
माझे निखळ उसळणे
निखळणे
आणि विकासात माझ्या
अचम्बित विनाश

एक गळती नियतीची
आणि तोचतोचपणाचा
मुश्किलसोपा खेळ
आणि केवळ शिल्लक वेळ

विचाराला
माझ्या नशिबात.

४ आप्मन मी
माझ्या असण्यात
सरकणारे स्तर
बुडणारे सविस्तर
दिसण्यात तिथे एक प्रछन्न द्वंद्व
अंतरावरती
एकापासून एक
मी तिथलाच त्यातलाच
जिथे
भोगांचा वनवास
व्यासंगाचा संहार
केवळ कैवल्य जिथे
दुरावणारे सर्व तिथे वैफल्य
जिथे मी आप्मन
आप्मन माझ्ना स्वभाव
एक वाढ
कधीची वाट पहाणारी
एक गाढ गोडवा
विध्वंसात पोळलेला
तिथे मी पळालेला
कळालेला
सर्व
आप्मनी

मी पहातो
उ
भ्या
उ अस्तित्वाची वैचारिक दुर्दशा
भ्या एकटेपणाने
ने

आयातीच्या निरकुंश सरकतीवर त्यांचे ढंग
अव्यंगपणे सामोरे जात उत्तरवाद्यांना
कायापालटीचा अमोघ चमत्कार
केवळ निमूट. दणकटी खट्याळपणासहित

आक्रमण शैलीचे आणि रंगेलीचे

बिनघोर तपस्यांची सपाटी आपटी
उसन्या प्रश्नात आयात्ती उत्तरात
आणि निरुत्तर मी
अस्पृश्य उभा

अनुभवत
उ
भ्या एकटेपणाची विनोदी नासाडी
उ आणि
भ्या ट्रॅजीक दुर्दशा पहाडींची
ने

६ ठेवतो मी
रहा
सृजनाचे एक थोटेपण म्हणून गा
जग
आणि रग
जाणिला दे सतर्कता
छेद आणि विभाग
भाग भागांचे
ठिसूळीला असू दे एखादे दर्शन
प्रदर्श
अवर्षणे आणि आकर्षणे
दे झटापटी
खटापटींना
अटीतटीने लगट कर भोगाशी
मागेन तेव्हा दे आणि रहा निमूट
नको तटातूट
ओरबाड
खाऊन घे भांबावणे
ढेकर एक उत्तर
आणि वहा
ज्यासाठी मी ठेवतो
जवळपणात.

७ तर्कांची अनावर हौस असलेले सर्व

भावाअलिकडे - सवयीसारखे
पलिकडे वावर उस्फूर्ततेचा
भोग ठरलेला
स्वातंत्र्य केवळ सराव आहे म्हणून आहे
अपरिहार्यासारखे
एकूण एक अटळतेत
एकूण एक निराशा
बाकी सावत्र
सार्वत्रिक
सखोलपण,
फक्त आसपास
खाजगीपणाच्या
पोरके.

८ सवय लयीसारखी
व्याकरण नाचवण्याची
अद्याप जात नाही
प्रत्यक्षात चालणे गद्यासारखे
अनुमानात्मक यात्रा विराम निवडीत
विराण चिवडीत
पूर्णाचा शोध लागावा म्हणून सरकतात
स्तब्धतेसारख्या
गोंधळ हुंगीत सरकत जाते असणे नसण्याकडे
भ्रमातून भ्रमासारखे
विसंगतीच्या प्रत्येक खांदेपालटीत
एक कायापालट
आणि मृत्यू तर ठरलेलाच
अपेक्षित चमत्कारासारखा
व्याकरण निवडले तेव्हाच निश्चित झालेला
असण्याइतकाच
जणू आयुष्यभर जगण्याने केलेल्या नृत्याची बेरीज
जिच्यात शून्य काहीच नाही.

# ॥ श्रद्धांजली ॥

॥ एक ॥

दोन्ही हातात आसवांची फूलं भरून
या माझ्या परमपवित्र, महन्मंगल
सनातनवादी, परंपराप्रिय
स्वतंत्र, लोकशाहीवादी, प्रजासत्ताक (?)
वगैरे-वगैरे आणि इत्यादी-इत्यादी असलेल्या
महान देशाला, ही माझी श्रद्धांजली.
उद्या कदाचित
माझे शब्द फितूर झाले तर
श्रद्धांजली वाहण्याचा शिष्टाचार
अपूरा राहू नये म्हणून.

॥ दोन ॥

'इथं माणसांचे लिलांव चालतात'
अशी पाटी लावलेल्या गावांगावातून
मी भटकलो. पण तिथं
कवितेवर माणसं मिळत नव्हती.
माझ्या शब्दांचा नाद
रुपयांच्या नादापुढे वांझ ठरला
आणि मी हरेक दलालाला सलाम करून
पुढील गावाची वाट विचारत राहिलो.
आज त्या गावांना, माणसांच्या दलालांना,
रुपयांना, वाटेला ही श्रद्धांजली.
पुढील गावाची वाट विचारण्याची
सोय व्हावी म्हणून.

॥ तीन ॥

मी त्यांच्याकडे मागीतली
आभाळ पेलणारी एखादी नजर.
त्यांनी दिला डोळ्यांवरील ढापणांचा नजराणा
(टांग्याचा घोडा समजून)
पुढची सारी गावं
मी त्यांच्या रंगीत चष्म्यातून पहात गेलो.
(चष्मा रंगीत असणं तसं फार आवश्यक असतं.
फुटलेल्या पांपण्यांचा बांध झाकता येतो.)
चष्म्याच्या रंगीत काचेत मावणारी दुनिया
फार सुंदर दिसते. कारण
चष्म्याच्या कडांवर दफन असतात.
माणसांची चालती-बोलती प्रेते,
आणि मग होतात सारीच गावे उजाड.
पायांखालील माळरान आपले असते.
आणि आपल्याच पावलांच्या खुणांत
आपणच खोदत जातो
आपल्याच उध्वस्तपणाची सूर्यमुखी शिल्पे.
बाप हो, साऱ्याच चष्म्यांना ही श्रद्धांजली,
काचांचा रंग उतरू नये म्हणून.

॥ चार ॥

आपल्या नजरेत मावणारे आभाळ
आपले असते हे एक सत्य.
आणि पावलापुरतीही जमीन
आपली असत नाही ही वास्तवता.
कारण, इथल्या जमीनीच्या हरेक कणात
दबलेली असतात.
अनंत अतृप्त इच्छांची वांझ स्पंदने.
या मातीचा प्रत्येक अणू-रेणू
एकेक कबर असते उध्वस्त स्वप्नांची.
आपल्या मस्तकापासून आभाळापर्यंतची उंची
हीच आपल्या मस्तकापासून पायांपर्यंतची
अंतस्थ खोली असते.
(आपणच पृथ्वी असतो
आपणच सूर्य असतो, हे ही खरेच.)
या मातीला, पावलांना, नजरेला,
आपणच 'आपण' असण्याला
ही श्रद्धांजली,
आपल्यालाच आपली ग्रहणे
भोगता यावीत म्हणून.

॥ पाच ॥

हे राज्य अश्वत्थाम्याचं.
इथं हरेक कोपऱ्यावर एकेक झाड,
कावळ्यांची चढाओढ
राजहंसांना बिनधास्त फाशी.
(फाशीचा दोर वळणारे हात ही आपलेच.
तेवढाच एक पोट भरण्याचा धंदा.)
इथं वाढतात माणसांचे मणकाहीन वंश
ज्यांची चाललेली असते आयुष्यभर
मान संतुलित ठेवण्याची जीवघेणी धडपड.
कारण सलाम ठोकायलाही
मान एका विशिष्ट कोनात अन्
हातांची लयबद्ध निर्जिवता हवी असते.
नाहीतर सम्राट कावळे सोडतात हुकूम
मुड्द्यांना फाशी देण्याचा.
या राज्याला, कावळ्यांना,
मणकाहीन मानांना, हातांना ही श्रद्धांजली.
विश्वाचा वधस्तंभ चिरंजीवी व्हावा म्हणून!

**अश्वत्थामा**

# पॅपिलॉन

॥१॥

पूर्वजांच्या चिरंतन गांडूपणाचं समाधिस्थ डुक्कर
आणि माझ्या कवितेचा कॅनव्हास.

॥२॥

तर तो आला
च्यायला त्याचं तरी काय नडलं होतं यायचं?
पण हे बाकी तुमच्या आमच्यातच बरं का
म्हणजे काय की तो माझ्याकडं येतो हे तुम्हाला
आणि तरीही कुणालाच माहित नाही
तर तो आला.
म्हणाला -
''एक समुद्रधुन लाटांची
एक पाऊलखूण वाटांची....''
आता मला सांगा,
खडकावर आदळलेली लाट संपूर्ण परतते का?
मी तर म्हणतो,
अर्ध पाणी खडक पितो
पाव पाणी पलिकडं फेकतो
आणि उरलेलं परत जातं
च्यायला त्याचं तरी काय नडलं होतं यायचं?

॥३॥

तर तो आला
त्याचे प्रश्न बरेच होते
तसं तो बरंच काही विचारतो मला आणि तुम्हालाही
पण तरीही तो काहीच विचारत नाही
च्यायला त्याचं तरी काय नडलं होतं विचारायचं?
तरी त्यानं विचारलं—
''पॅपिलॉन, तुला देखील जगायला
ऑक्सिजनच लागतो का रे?
की गर्भाशयातील ऊब चालते?''
आता मला सांगा
प्रत्येक पॅपिलॉनची उडी अचूकच बसते का?
मी तर म्हणतो,
एक पॅपिलॉन उडी मारतो,
अर्धा जगतो
पाव मरतो
आणि उरलेला पुन्हा अडकूनच राहतो.

॥४॥

तो उभा होता
हिरव्यागार कुरणांची लांबच लांब रांग
आणि टोकाला प्रचंड मोठी औद्योगिक वसाहत
तो म्हणाला –
''ह्या टोकापर्यंतचं गवत उपटून निघेल
मी चालत निघालो की''
आता मला सांगा
गवत उपटून निघाल्यावर तिथं काहीच उगवणार नाही?
मी तर म्हणतो
दुप्पट उंचीचं फुलांनी मोहरलेलं तण उगवेल तिथं
तर त्यानं पुन्हा विचारलं –
''पॅपिलॉन, तुला देखील जगायला
ऑक्सिजनच लागतो का रे?
की फर्नेसमधील धग चालते?''
आता मला सांगा,
फर्नेसमधील धग कुणाला चालणार नाही?
ती तर प्रत्येकाला आवडावीच लागते म्हणूनच,
एक पॅपिलॉन उडी मारतो
अर्धा जगतो,
पाव मरतो
आणि उरलेला पुन्हा अडकूनच राहतो.

॥५॥

पूर्वजांच्या चिरंतन गांडूपणाचं समाधिस्थ डुक्कर
आणि माझ्या मृत्यूचा कॅनव्हास.

**- श्रीनिवास एकसंबेकर**

# पाऊस : त्या वर्षाचा

पाऊस पडून गेल्यानंतरचे चिखल रस्ते तेवढेच
लक्षात राह्यले त्या वर्षीचे
पायांसकट स्लिपर्स्, पँट, शर्ट ही
खराब होत गेले जपून जपून चालतांनाही
नंतर नंतर तर लोकांनीही म्हणून घेतलं
आपण खराब झाल्याचं त्याच वर्षी.

क्वचित क्वचित सूर्य दिसणाऱ्या त्या वर्षीच्या पावसाळ्यात
पाऊस चांगला होत असल्याचे सगळेच म्हणाले
दिवसभर आभ्रांसकट ढग आणि घुसमट वातावरणात
कसेबसे श्वास घेतल्याचंच फक्त लक्षात राह्यलं त्यावर्षी.

गाव संपल्यानंतर गावाबाहेर हिरवळ
कुठ पोपटी कुठं कोवळी
झाडांझाडांत ऊन रस्ता शोधत कसंबसं - रस्त्यावर
आपणही तसेच दिशाहीन सरळ रस्ताच शोधत पायाखाली
आसपासच्या बहर दिवसांत गावाबाहेर त्याच वर्षी.

—आल्हाद भावसार

# पण, अजूनही तुझे श्वास

मी निसटून जाईन म्हणतो
पण, अजूनही तुझे श्वास माझ्या छातीत घुसमटताहेत!
***
माझ्या डोळ्यासमोर तुझ्या आठवणी
तुझ्या-माझ्यातलं एक व्यावहारिक अंतर
नाही देऊ शकत माझ्या
जगण्याला जराही ऊब
या अनामिक गर्दीत हळूहळू हरवत चाललोय मी
माझा चेहरा
सिग्नलचा लाल दिवा लागला की
थांबावं लागतं इतकी सवय होतेय हल्ली मला
इथल्या या आखलेल्या चौकांची
आणि पद्धतशीरपणे रस्त्याच्या डाव्या बाजूने चालण्याची
***
मी अलिकडे जास्त ताकदीने
बिल्डिंगमध्ये राहण्याचे स्वप्न पाहू लागलो आहे
समुद्राजवळ असूनही
कवितेपासून तुटत चालल्याचं भान
मला तितकसं अस्वस्थ करत नाही
खरं सांगतो
एवढ्या मोठ्या जातीय दंगलीच्या बातम्याच
मी फक्त वाचत गेलो डायनिंग टेबलावर बसून
टोस्ट बटर खात खात
माझं रक्त वगैरे खवळलं नाही
पूर्वी मोर्च्यात उपाशीपोटी घोषणा दिल्याच्या
आठवणींना अलिकडे तेवढं महत्त्व
उरलं नाही माझ्या लेखी!
***
इकडे तुझं पत्र आल्यावरही
भारावल्यासारखं होत नाही
तू अजूनही इतकं रोमॅन्टिक कसं काय
लिहू शकतेस आपल्या आयुष्यावर
आणि बंद पत्रावर Guess me? लिहिण्याची सवय
कधी बंद करणाराहेस तू?
***
राहिलेत अजूनही आपणात
पहिल्याच भेटीएवढे औपचारिक संबंध
की, मलाच ओलांडता येत नाही
ही भिंत?
***
माझा अंकुर कुठेतरी तुझ्या शब्दात
जिवंत असल्याची खूण जरी तुझ्या
पत्रात दिसत असली
तरी तुझ्या निखळ श्वासांना मी
अर्थ देऊ शकत नाही
तू आता कृपया
माझी नवी कविता मागण्याचा
जुना हट्ट करू नकोस!
***
मी निसटून जाईन म्हणतो
पण, अजूनही तुझे श्वास माझ्या
छातीतच घुसमटताहेत!

- मंगेश बनसोड

# पावसाळा १९९०

(बालकवी, बोरकर, महानोर, पाडगावकर यांच्या
पावसाळ्यांना नम्र श्रद्धांजली वाहून)

॥ १ ॥

आकाशाला माणसांचा वास येतो की नाही
मला माहित नाही
पण ढगांचे डोळे उघडतात तेव्हा
माणसांच्या छत्र्या होतात

॥ २ ॥

पाऊस असते
एक परमेश्वराएवढी अगम्य घटना
किंवा छत्री एवढे सत्य किंवा रेनकोटाएवढा चुटका
करणारे करतात
त्याच्या कार्यकारणभावाचे विश्लेषण
नकाशाला आभाळभर पसरून शिकवतात मेंदूंना
ढगांच्या समुद्राशी असलेल्या नात्यांची चिकित्सा
पण पावसाचा माणसाकडे पाहण्याचा दृष्टीकोन काय
ह्याविषयी ते अनभिज्ञ असतात
म्हणणारे म्हणतात
ढग ही परमेश्वराची दया असते
पण
दुष्काळात ढग हरवतात तेव्हा
त्याची दया कुठल्या सुकाळात गुंतलेली असते
की परमेश्वर आंधळा असतो
पाण्याइतकाच

॥ ३ ॥

सृष्टीचा कुठलाही स्रोत सृष्टीपलिकडे शोधणारे रोमॅण्टिक साधू
पाऊस आला की
अंगणभर शब्द अंथरून त्यात नाचत बसतात
त्यांच्या काळ्या कमरेतून
हिरवा पिसारा उमलेल काय
त्यांच्या बोडक्या डोक्यावर
डौलदार तुरा उगवेल काय
मला साधूंच्या प्रदेशातील हवामानाचा अंदाज कधीच येत
नाही
फक्त त्यांनी निर्माण केलेल्या प्रश्नांची कागदी नाव तयार
करून
ती अलगद पाण्यात सोडून देणे मला चांगले साधते
त्यामुळे ते टाईमलेस होतात
माझा चांगला टाईमपास होतो.

॥ ४ ॥

तसा शेतीशीही संबंध उरलेला नाही माझा
कुळकायद्यात जमिनी जन्म होण्यापूर्वीच
माझ्या बापजाद्यांनी त्या हत्तीवरून वाटून टाकल्या होत्या
पूर्वी जमिनी काळ्या हत्तीसारख्या काम करायच्या
त्यांच्यातून उगवलेले पीक हस्तीदंताइतकच नैसर्गिक असायचं
आतामात्र जमिनीतल्या कुठल्याही पीकाला
शेणाऐवजी डिझेलचा वास येतो
आणि ट्रॅक्टरच्या फाळाखाली
तांगड्या फासटून पसरलेला जमिनीचा देह
वेश्येसारखा पैसे मोजून घेतो

॥ ५ ॥

पाऊस आणि जमीन
यांचा कार्यकारण संबंध थोडासा हरवला असला तरी
माणसे ढगाविषयी उदासिन राहू शकत नाहीत
त्यांच्या डोळ्यात पूर्वी जमीन काजळ घालायची
आता मात्र साखर कारखाने
शॅम्पुपासून लिपस्टिकपर्यंत सर्वच पुरवतात
त्यामुळे ढगांना अंगाच्या किंवा कपड्याच्या साबणाइतकीच
किंमत असली तरी
त्यांचीही आयुष्याच्या बाथरूममध्ये एक विशिष्ट जागा असतेच
म्हणूनच ढगांना आणि माणसांना पाहून
मी पुरता उदास होत नाही
फक्त माणसांच्या ज्या छत्र्या होतात
त्या गोळा करून
कवितेच्या पावसाळी मार्केटमध्ये पाठवून देतो
आणि शब्दांनी दिलेली नाणी खिशात खुळखुळवत
पावसाचे गीत गात बसतो
येरे येरे पावसा
मला देना पैसा
पैसा झाला मोठा
पाऊस आला खोटा

- श्रीधर तिळवे

प्रकाशक व दृश्य नियोजक : भालचंद्र कुबल

संपादक : श्रीधर तिळवे

सहाय्यक संपादक : मंगेश बनसोड
आल्हाद भावसार

प्रायोजक : 'कालनिर्णय'

२०५, कृष्णपिंगाक्ष, ८२३६, कन्नमवार नगर,
विक्रोळी, मुंबई-४०० ०८३. ☎ ५७८ ७८ ३७

आशुतोष आपटे ९३